**रेशीम कक्षासाठी मंत्रालयीन स्तरावर पदे निर्माण करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक सववि ३३११/प्र.क्र.४२१/११/आस्था-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०११

**प्रस्तावना :** राज्यात रेशीम संचालनालयाची स्थापना शासन निर्णय दि.२७.८.१९९७ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली करण्यात आली. रेशीम संचालनालयामध्ये उद्योग संचालनालय, खादी ग्रामोद्योग मंडळ, आंतरराज्य कोसा प्रकल्प यातील कार्यरत असणारा अधिकारी/कर्मचारी वर्ग हस्तांतरीत करण्यात आलेला आहे. परंतु त्यावेळी मंत्रालयीन विभागाकरीता कोणताही अधिकारी/कर्मचारी वर्ग निर्माण करण्यात आलेला नाही.

रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी पुढील ५ वर्षांमध्ये विभागाकडून १२ व्या पंचवार्षिक योजनेअंतर्गत तुती लागवड, अंडीपुंज निर्मिती, अंडीपुंज पुरवठा, कोष उत्पादन करणे या अनुषंगाने कोषउत्पादनात होणारी वाढ विचारात घेता, कोषांचे दर निश्चित करणे, कोष खरेदी व विक्रीचे दर निश्चित करणे, अंडीपुंज निर्मिती केंद्राच्या मूलभूत सुविधांचे बळकटीकरण करुन क्षमतेचा परिपूर्ण वापर करणे तसेच कोषावरील प्रक्रिया करण्यासाठी खाजगी उद्योजकांना प्रोत्साहन देणेबाबत धोरण ठरविणे या सर्व उद्दिष्टांची पूर्तता करण्याकरीता तसेच १२ व्या वार्षिक योजनेअंतर्गत ठरविण्यात आलेला कृती आराखडयाच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करण्याच्या दृष्टीने मंत्रालयीन आस्थापनेवर अवर सचिव १ पद, सहायक १ पद व लिपिक-टंकलेखक १ पद अशी एकूण ३ पदे निर्माण करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्ताव दि.३.९.२०११ रोजी उच्चस्तरीय सचिव समितीसमोर ठेवण्यात आला होता. सदर प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार शासनाने पुढील निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-** या शासन निर्णयान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर खालील पदे अस्थायी स्वरुपात निर्माण करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर पदे दि.२९.२.२०१२ पर्यंत अस्थायी स्वरुपात पुढे सुरु राहतील.

| अ.क्र. | पदनाम | वेतनसंरचना | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | अवर सचिव | रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.६६०० | १ |
| २ | सहायक | रु.९३००-३४८०० ग्रेड पे रु.४३०० | १ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | रु.५२००-२०२०० ग्रेड पे रु.१९०० | १ |
| | एकूण : | | ३ पदे |

३. सदर नवीन पदांवरील वेतन व भत्त्यावरील खर्च हा **"मागणी क्रमांक -व्ही-२, ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा, (००)(०९०)-सेक्रेटरीएट, (०१) (०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग दत्तमत(३४५१ ०३० ४), ०१ वेतन/०२ मंजूरी/०३ अतिकालिक भत्ता/११ देशांतर्गत प्रवास खर्च/१३ कार्यालयीन खर्च/१४ भाडेपट्टी व कर/१७ संगणक खर्च/ २० इतर प्रशासकीय खर्च/ २८ व्यवसायिक सेवा"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.३.९.२०११ रोजी संपन्न झालेल्या ६७ व्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०९२२१७१५१२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( क.कि.पारकर )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई (पत्राने)
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा.मंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा.मंत्री (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा.मंत्री (वस्त्रोद्योग ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (सहकार/पणन/वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, प्र.सचिव (वस्त्रो.), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, प्र.सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक (रेशीम), रेशीम उद्योग संचालनालय, नागपूर.
सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण/प्रशासन)
सर्व जिल्हा उपनिबंधक/जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-१
सर्व प्रादेशिक उपसंचालक, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग
सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी व ग्रामीण विकास बँक, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी तेलबिया उत्पादक महासंघ, जळगांव
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
निवासी लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती)
उप कोषागार अधिकारी, नवी मुंबई, वाशी
वित्त विभाग ( व्यय-२/अर्थसंकल्प २/अर्थ-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई
सामान्य प्रशासन विभाग (१४अ/१९) मंत्रालय, मुंबई
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती